राज्यातील दूध भुकटी व द्रवरुप दूध तसेच अतिरिक्त दूधाचे रुपांतरणास प्रोत्साहनपर अनुदान या योजनेकरीता नवीन लेखाशीर्ष उघडण्यास मान्यता देणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमएलके-२०१९/प्र.क्र.२४/पदुम-८**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ६ जानेवारी, २०२०.

**संदर्भ :** १) शासन निर्णय क्रमांक लवेसू-२०१८/प्र.क्र.८/पदुम-८, दिनांक २०/०७/२०१८.
२) शासन निर्णय क्रमांक लवेसू-२०१८/प्र.क्र.८/पदुम-८, दिनांक ३१/०७/२०१८.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयान्वये दूध भुकटी व द्रवरुप दूधाची निर्यात करण्यासाठी सहकारी व खाजगी दूध भुकटी प्रकल्पांना अनुक्रमे रु.५०/- प्रति किलो व रु.५/- प्रति लिटर प्रोत्साहनपर अनुदान व राज्यातील उत्पादित होणारे पिशवीबंद दूध वगळून उर्वरित दूध रुपांतरणाकरीता प्रति लिटर रु.५/- याप्रमाणे अनुदान योजना राबविण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत वितरित करावयाच्या अनुदानाकरीता अर्थसंकल्पित झालेला निधी “मागणी क्र.डी-५, २४०४ दुग्धव्यवसाय विकास, २०२, शासकीय दूध योजना पुणे, प्रापण (अनिवार्य) (२४०४ ०८०४), २९-दूध खरेदी” या लेखाशीर्षाखाली उपलब्ध झाला होता. तथापि सदर योजना ही स्वतंत्र व नविन योजना असल्याचे लक्षात घेऊन योजनेकरीता स्वतंत्र लेखाशीर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राबविण्यात आलेल्या राज्यातील दूध भुकटी व द्रवरुप दूध तसेच अतिरिक्त दूधाचे रुपांतरणास प्रोत्साहनपर अनुदान या योजनेकरीता खालीलप्रमाणे नवीन लेखाशीर्ष उघडण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| मागणी क्र.डी-०५<br>२४०४-दुग्धव्यवसाय विकास<br>००<br>१०२- दुग्धव्यवसाय प्रकल्प<br>(०५) दूध व दूध भुकटी करिता अनुदान<br>(०५)(०१)-अतिरिक्त दूधाचे रुपांतर व निर्यात करिता अनुदान<br>३३-अर्थसहाय्य<br>(२४०४........) (अनिवार्य) | Demand No.D-05<br>2404-Dairy Development<br>00<br>१०२- Dairy Development Project<br>(05) Subsidy for Milk and Milk Powder<br>(05)(01) Subsidy for Conversion and Export of Excess Milk<br>33-Subsidies<br>(2404.......)(Committed) |

उपरोक्त लेखाशीर्षांतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीच्या विनियोगाकरीता उपायुक्त (प्रक्रिया व वितरण), आयुक्त, दुग्धव्यवसाय कार्यालय यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत असून, आयुक्त, दुग्धव्यवसाय यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

राज्यातील दूध भुकटी व द्रवरुप दूध तसेच अतिरिक्त दूधाचे रुपांतरणास प्रोत्साहनपर अनुदान या योजनेकरीता नवीन लेखाशीर्ष उपलब्ध करुन देण्यात आल्यामुळे सदर योजनेवर आतापर्यंत "२९-शासकीय दूध खरेदी" या जुन्या लेखाशीर्षातून खर्ची पाडण्यात आलेला निधी नवीन लेखाशीर्षात प्रत्यार्पित करण्याची कार्यवाही आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांनी करावी.

प्रस्तुत लेखाशीर्ष वित्त विभाग व महालेखाकार कार्यालयाने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००१०६१७२६१३४००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Rajesh Shaligram Govil

Digitally signed by Rajesh Shaligram Govil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c549410b2251df8c92783a2da17afcacbe7f8fe3a4fd88f156fea84433871f11, serialNumber=3cec7a5cf8d124a0d8e15bfc85a782c01ef27eaee8bedaba4dce3416562097ac, cn=Rajesh Shaligram Govil
Date: 2020.01.06 17:12:46 +05'30'

**( राजेश गोविल )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-१, मुंबई/नागपूर.
२) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई.
४) उपायुक्त (प्रक्रिया व वितरण), आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांचे कार्यालय, वरळी, मुंबई.
५) उपायुक्त व वित्तीय सल्लागार, आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचे कार्यालय, वरळी, मुंबई.
६) लेखा व कोषागारे, मुंबई.
७) सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी.
८) कक्ष अधिकारी (पदुम-१६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती.